**संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई यांचे आस्थापनेवरील सहायक संचालक, गट "ब" या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून प्राप्त शिफारशीनुसार करण्यात आलेली नियुक्ती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्रमांक: औसुवआ-०२२४/प्र.क्र.३९/काम.-१**
मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०७.०३.२०२५.

**पहा:-** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. आयएलआर-२१२१/प्र.क्र.१०३ /२०२३/ अठ्ठावीस, दि.०७.०९.२०२३.
२) शासन निर्णय क्र.औसुवआ-०९२३/प्र.क्र.१४८/काम.१,दि.१८.०७.२०२४.
३) शासन निर्णय क्र.औसुवआ-०२२४/प्र.क्र.३९/काम.१,दि.०९.०८.२०२४
४) शासनाचे पत्र क्र.औसुवआ-०२२४/प्र.क्र.३९/काम.१, दि.१५.१०.२०२४

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांचे आस्थापनेवरील सहायक संचालक, गट "ब" या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी संदर्भीय क्र.१ च्या दि.०७/०९/२०२३ रोजीच्या पत्रान्वये ४४ उमेदवारांची शिफारस केली आहे. त्यामध्ये श्री. किशोर रामलाल माठे यांची आयोगाने अ.ज. या प्रवर्गातून सहायक संचालक,गट-ब (राजपत्रित) या पदावरील नियुक्तीकरीता शासनास शिफारस केली होती.

२. त्याअनुसार शासनाने संदर्भीय क्र.२ येथील दि.१८.०७.२०२४ रोजीच्या आदेशाव्दारे श्री. किशोर माठे यांना सहसंचालक औसुवाआ, पुणे (कार्यक्षेत्र-२) येथे नियुक्तीने पदस्थापनेचे आदेश जारी केले होते.सदरहू, आदेशानुसार श्री. किशोर रामलाल माठे यांनी सहायक संचालक, गट-ब या पदावर १ महिन्यामध्ये पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होणे अपेक्षित होते.

३. तथापि, श्री. किशोर माठे यांनी दि.२३.०७.२०२४ रोजीच्या अर्जान्वये ते जलसंपदा विभागात कार्यरत असल्याने सध्याचे पावसाळी कालावधीत पर्जन्यकामे व आपत्कालीन स्वरुपाची कामे उद्धभवत असल्याने त्यांना कार्यालयातुन कार्यमुक्त होण्यास महीन्याभरापेक्षा अधिकचा कालावधी लागण्याची शक्यता आहे व त्यामुळे पुढील कार्यमुक्तीची प्रक्रिया शासनस्तरावरून पुर्ण होण्यासाठी अधिकचा विलंब होण्याची शक्यता असल्याने, सदरहू ठिकाणी रूजू होण्यास २ महिन्याची

मुदतवाढ देणेबाबतची विनंती शासनास केली. त्यानुषंगाने त्यांना सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सदर पदावर रुजू होण्याकरीता प्रथम २ महिन्याची मुदतवाढ दि.०९.०८.२०२४ च्या शासन आदेशाद्वारे देण्यात आली होती.

४. श्री.किशोर माठे यांनी ३ महिन्यापर्यत उक्त पदावर रुजू होण्यास दिलेल्या कालावधीत म्हणजे दि.१७.१०.२०२४ पर्यंत पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होणे अपेक्षित होते. तथापि, सदरहू दिलेल्या मुदतवाढीच्या कालावधीतही श्री. माठे हे रुजू न होता, त्यांनी दि.१०.१०.२०२४ रोजीच्या ई-मेलव्दारे पुन्हा उक्त परि.२ येथील नमूद कारणामुळे अतिरिक्त १ महिन्याची मुदतवाढ देण्याची विनंती शासनास केली. याबाबत, श्री. माठे यांना नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने दि.१५.१०.२०२४ रोजीच्या पत्राव्दारे दि.१७.१०.२०२४ पर्यंत सहायक संचालक,गट-ब या पदावर रुजू न झाल्यास, त्यांची नियुक्ती संपूष्टात येईल, असे कळविण्यात आले होते. शासनाच्या दि. १८.०७.२०२४ रोजीच्या आदेशापासून आजतागायत म्हणजेच ७ महिने इतका कालावधी उलटूनही श्री. माठे हे नियुक्तीच्या पदावर रुजू झाले नाहीत. तसेच त्यांनी कोणताही प्रतिसाद दिलेला नाही. यावरुन त्यांना सहायक संचालक, गट-ब, औसुवआ या पदावर रुजू होणेबाबत कोणतेही स्वारस्य नसल्याचे स्पष्ट होते.

५. यास्तव श्री. माठे यांच्या प्रकरणी सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२८.०५.२०१८ च्या शासन निर्णयातील परि.३ मधील तरतुदीस अनुसरून नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने, त्यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेली शिफारस/ नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

उपरोक्त संदर्भीय क्र.२ येथील दि.१८.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे या विभागाच्या अधिनस्त संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर खालीलप्रमाणे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाद्वारा पुरस्कृत श्री. किशोर रामलाल माठे ह्या उमेदवाराची सहायक संचालक, गट-ब (राजपत्रित) या पदावर केलेली नियुक्ती रद्द करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उमेदवारांचे नांव | गुणवत्ता क्रमांक | मुळ प्रवर्ग | मलोआ ने शिफारस केलेला प्रवर्ग |
|---|---|---|---|---|
| १. | श्री. किशोर रामलाल माठे | ३५ | अ.ज. | अ.ज. (सर्वसाधारण-२) |

२.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०७१५०४२६०२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BABASAHEB SITARAM SHINDE

Digitally signed by BABASAHEB SITARAM SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC0323A0A674CB4C457CBB6B2C0F8B750E0EE28B3CABD66F127CF1EF467412AE, cn=BABASAHEB SITARAM SHINDE
Date: 2025.03.07 15:05:28 +05'30'

**( बा. सि. शिंदे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति**

श्री. किशोर रामलाल माठे,
सहायक संचालक, गट-ब (शिफारसप्राप्त उमेदवार) **( ई-मेलव्दारे )**

**प्रत:-**

१) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३) मा.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे**)
४) उप सचिव/अवर सचिव (कामगार-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
५) संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई.
६) सह/उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग / कार्या-१२/१६-ब, मंत्रालय, मुंबई
७) निवड नस्ती (काम-१)